| | |
|---|---|
| कोषागारातून देय अनुदान | अर्थसंकल्पीय अनुदान सन २०११-२०१२. |

२०५३ जिल्हा प्रशासन (०७) (०१)
ग्रामपंचायतीचे सरपंच व सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचा-यांचे किमान वेतन यासाठी अनुदाने ३१- सहाय्यक अनुदान ( २०५३ १०४२ )

अ) ग्रामपंचायत कर्मचा-यांच्या किमान वेतनासाठी ग्रामपंचायतींना सहायक अनुदान वितरण ( २०५३ १०४२ )

ब) ग्रामपंचायत सरपंचांना मानधन व सदस्यांना बैठकभत्ता देण्यासाठी ग्रामपंचायतींना सहायक अनुदान वितरण (२०५३१०४२).

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र. व्हीपीएम- २०११/प्र.क्र.१२५/पंरा-३,**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२. दिनांक :- १५ ऑक्टोबर, २०११.**

वाचा -
१) शासन निर्णय, क्र. व्हीपीएम २६९९/प्र.क्र.२०६ (१)/२१, दिनांक २१ जानेवारी, २०००.
२) शासन निर्णय, क्र.व्हीपीएम-२००६/प्र.क्र.१७२/पंरा-३, दिनांक २२ फेब्रुवारी, २००७.
३) शासन परिपत्रक, क्र.व्हीपीएम-२००९/प्र.क्र.१३९/पंरा-३, दिनांक १३ जुलै, २००९.
४) शासन निर्णय, क्र.व्हीपीएम-२००९/प्र.क्र.१२५/पंरा-३, दिनांक २७जुलै, २००९
५) शासन निर्णय, क्र.व्हीपीएम-२०१०/प्र.क्र.१२५/पंरा-३, दिनांक २३ मे, २०११

शासन निर्णय :-

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात "ग्रामपंचायतीच्या कर्मचा-यांच्या किमान वेतनावरील खर्च भागविण्याकरीता ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२०५३१०४२)" तसेच "ग्रामपंचायतीचे सरपंचांना मानधन व सदस्यांना बैठक भत्ता यावर होणारा खर्च भागविण्याकरिता ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२०५३१०४२)" या दोन्ही अनुदानाकरीता एकत्रितरित्या रक्कम रुपये ६०,८५,६९,०००/- (रुपये साठ कोटी पंच्याऐंशी लक्ष एकोणसत्तर हजार मात्र) इतकी तरतुद उपरोक्त लेखाशिर्षाअंतर्गत अर्थसंकल्पाद्वारे उपलब्ध झालेली आहे.

२. सदर तरतूदीमधून दि. २३ मे, २०११ च्या शासननिर्णयाव्दारे "ग्रामपंचायतीच्या कर्मचा-यांच्या किमान वेतनावरील खर्च भागविण्याकरीता ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२०५३१०४२)" याकरीता रक्कम रु.१०,५१,४७०००/- आणि "ग्रामपंचायतीचे सरपंचांना मानधन व सदस्यांना बैठक भत्ता यावर होणारा खर्च भागविण्याकरिता ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२०५३१०४२)" याकरीता रक्कम रु. ४,७१,८६०००/- इतकी अशा त-हेने एकुण १५,२३,३३,०००/- इतकी रक्कम या आधी वितरीत करण्यात आली आहे.

२. आता, या शासन निर्णयाद्वारे सन २०११-१२ या आर्थिक वर्षात उपरोक्त लेखाशिर्षाअंतर्गत करण्यात आलेल्या एकुण तरतूदीतून "ग्रामपंचायतीच्या कर्मचा-यांच्या किमान वेतनावरील खर्च भागविण्याकरीता ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२०५३१०४२)" याकरीता रक्कम रु.२०,९७,१५,०००/- आणि "ग्रामपंचायतीचे सरपंचांना मानधन व सदस्यांना बैठक भत्ता यावर होणारा खर्च भागविण्याकरिता ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२०५३१०४२)" याकरीता रक्कम रु. ९,४३,७८,०००/- इतकी अशा त-हेने एकूण ३०,४०,९३,०००/- ( तीस कोटी चाळीस लक्ष त्र्याणव हजार मात्र) इतकी रक्कम सोबत

जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांना वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम बीडीएसद्वारे उपलब्ध करुन देण्यात आली आहे. यास्तव सदर रक्कम बीडीएसद्वारे काढून घेऊन तात्काळ ग्रामपंचायतींना वितरीत करावयाची कार्यवाही मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, मुख्य लेखा व वित्त अधिकारी आणि उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) यांनी करावी.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी संबंधीत जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी त्यांच्या जिल्हयातील ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या रक्कमा कोषागारातुन काढून त्या धनादेशाद्वारे संबंधित ग्रामपंचायतींना प्रदान करण्याची व्यवस्था करावी.

४. अ) ग्रामपंचायत कर्मचारी किमान वेतन अनुदान वितरीत करताना घ्यावयाची दक्षता

"ग्रामपंचायतीच्या कर्मचा-यांच्या किमान वेतनावरील खर्च भागविण्याकरीता ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२०५३१०४२)"हे अनुदान वितरीत करताना शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक व्हीपीएम-२६९९/प्र.क्र.२०६ (१)/२१, दिनांक २१ जानेवारी, २००० मध्ये दिलेल्या सूचनाच्या अधीन राहून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी रक्कम अदा करावी. तथापि, संदर्भाधीन क्रमांक २ दिनांक २२ फेब्रुवारी, २००७ च्या शासन निर्णयानुसार अनुदानासाठी निश्चित केलेल्या सुधारित दरानुसार रक्कम ग्रामपंचायतींना अदा करावी. यासंदर्भात शासनाने परिपत्रक क्रमांक क्र.व्हीपीएम-२००९/प्र.क्र.१३९/पंरा-३, दिनांक १३ जुलै, २००९ अन्वये पुन्हा सविस्तर सूचना निर्गमित केल्या आहेत. सदर सूचना लक्षात घेऊन सदर अनुदान वितरीत करण्याची दक्षता घेण्यात यावी. (ग्रामपंचायत कर्मचा-यांच्या किमान वेतनाचे दर हे किमान वेतन कायदयानुसार आहेत व सदर किमान वेतनाचे दर हे उद्योग उर्जा व कामगार विभागाने त्यांच्या दि.२५.४.२००७ च्या अधिसुचनेनुसार जाहीर केले आहे. त्यानुसार ग्रामपंचायतीने तिच्या कर्मचा-यांना दरमहा किमान वेतनाइतके किमान वेतन ग्रामनिधीतून देणे बंधनकारक आहे. शासनाकडून ग्रामपंचायतींना केवळ आर्थिक मदत व्हावी या हेतूने किमान वेतनाच्या दराच्या काही प्रमाणात सदर अनुदान सहायक अनुदान म्हणून देण्यात येते याची नोंद घ्यावी. त्यामुळे ग्रामपंचायतीने या अनुदानावर अवलंबून न राहता, ग्रामपंचायतीच्या स्वउत्पन्नातून म्हणजेच ग्रामनिधीतून दरमहा ग्रामपंचायत कर्मचा-यांना किमान वेतनाइतके किमान वेतन दिले पाहीजे .)

ब) सरपंच मानधन व सदस्य बैठक भत्ता अनुदान ग्रामपंचायतीना वितरीत करताना घ्यावयाची दक्षता

"ग्रामपंचायतीचे सरपंचांना मानधन व सदस्यांना बैठक भत्ता यावर होणारा खर्च भागविण्याकरिता ग्रामपंचायतींना सहायक अनुदान(२०५३१०४२)" हे अनुदान शासन निर्णय, क्र.व्हीपीएम-२००९/ प्र.क्र.१२५/पंरा-३, दिनांक २७जुलै, २००९ मध्ये दिलेल्या सूचनेच्या अधिन राहून ग्रामपंचायतींना वितरीत करावे.

५. सदर अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यांत आले आहे, त्या कारणासाठीच याचा विनियोग केला पाहिजे, याबाबतची जबाबदारी जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

६. अनुदानातून केलेल्या खर्चाचे वेगळे लेखे जिल्हा परिषदेने ठेवणे आवश्यक आहे.

७. जिल्हा परिषदेने त्यांच्या विभागातील सर्व ग्रामपंचायतीची यादी तयार करुन त्यानुसार शासनाने वेळोवेळी दिलेल्या सुचनानुसार सर्व ग्रामपंचायतीकडून वेळोवेळी अद्यावत माहिती प्राप्त करुन घेऊन संपूर्ण वर्षाकरीता अनुज्ञेय अनुदानाची गणना करुन अनुदान वितरणाचे संपूर्ण वर्षाचे स्वतंत्र विवरणपत्र तयार करणे आवश्यक आहे.तसेच सदर विवरणपत्रानुसार जिल्हा परिषदेकडून ग्रामपंचायतींना वेळोवेळी अदा करण्यात येणा-या अनुदानाचे स्वतंत्र विवरणपत्र तयार करणे आवश्यक आहे. सदर विवरणपत्रामुळे जिल्हा परिषदेस ग्रामपंचायतींना सदर अनुदान नियमानुसार व त्वरीत अदा करणे शक्य होईल तसेच शासनास, विभागीय आयुक्त व महालेखापाल कार्यालयास या संदर्भात जिल्हा परिषदेला वेळोवेळी तात्काळ अचुक माहिती देणे शक्य होईल तसेच अनुदानाचा हिशोब परिपूर्ण राहील. हे अनुदान ज्या कारणासाठी अदा करण्यात आले आहे त्याचा कारणासाठी विनियोग करण्याबाबतची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( ग्रामपंचायत ) यांची राहील.

८. शासनाने वितरित केलेले अनुदान संबंधित ग्रामपंचायतींना विनाविलंब १० दिवसाच्या आत मिळेल याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी घ्यावी व याबाबतची जबाबदारी संबंधित जिल्हा परिषदेच्या उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( ग्राम पंचायत ) व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांची राहील.

९. वरील अटींची पूर्तता करुन घेता यावी म्हणून महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई आणि महालेखापाल, महाराष्ट्र (२) नागपूर यांना लेखा परिक्षणाकरीता जिल्हा परिषदेची पुस्तके व लेखा पाहणीचा अधिकार राहील आणि महालेखापाल यांना त्यांचे काम पार पाडण्याकरीता जिल्हा परिषदांनी सर्वतोपरी सहकार्य दिले पाहिजे.

१०. या अनुदानाच्या वितरणाबाबचा खर्च "ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मागणी क्र. एल -२, २०५३ जिल्हा प्रशासन (०७ ) (०१ ) ग्रामपंचायतीचे सरपंच व सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचा-यांचे किमान वेतन यासाठी अनुदाने ३१- सहाय्यक अनुदान ( २०५३१०४२ )" या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या तरतूदीतून खर्ची घालण्यांत यावा. तसेच वितरित अनुदानाची खर्चमेळ विषयक कार्यवाही संबंधित जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पूर्ण करुन खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्तांना पाठवावीत. विभागीय आयुक्तांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापालांकडे नोंदलेल्या खर्चाचा मेळ घालावा व अहवाल शासनाकडे पाठवावा.

११. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३१३/व्यय-१५/दि. १ सप्टेंबर, २०११ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभागाने सदर अनौपचारिक संदर्भान्वये प्रस्तुत लेखाशिर्षाखाली शासन निर्णय क्र. व्हीपीएम- २०११/प्र.क्र.१२५/पंरा-३, दि. २३ मे, २०११ अन्वये वितरीत केलेल्या अनुदानास सुध्दा मान्यता दिलेली आहे.

१२. हा शासन निर्णय शासनाच्या WWW.Maharashtra.gov.in या वेबसाइडवर उपलब्ध असून याचा संगणक सांकेतांक क्रमांक 201110181117380001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Archane.

( अर्चना वालझाडे)
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१, मुंबई, ( दोन प्रती )
२) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई, ( दोन प्रती )
३) महालेखापाल ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-२, नागपूर, ( दोन प्रती )
४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-२, नागपूर, ( दोन प्रती )
५) सर्व विभागीय आयुक्त,
६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८) सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत ),
९) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवीमुंबई
११) सर्व उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा ( वरिष्ठ )
१२) वित्त विभाग ( का. अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१६/व्यय-१५ ),
१३) का. क्र. वित्त-१, वित्त-७, वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
१४) निवडनस्ती ( कार्यासन क्रमांक पंरा-३ ),

शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०११/प्र.क्र १२५/पंरा-३, दि. १५ ऑक्टोबर, २०११ सोबतचे विवरणपत्र

लेखाशिर्ष -" ग्रामविकास व जलसंधारण, मागणी क्र. एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन (०७)(०१) ग्रामपंचायतीचे सरपंच व सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचा-यांचे किमान वेतन यासाठी अनुदान ३१- सहाय्यक अनुदान (२०५३ १०४२)"

| अ.क्र | जिल्हा परिषदेचे नांव | सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षात यापूर्वी वितरित करण्यात आलेले अनुदान (रुपये लाखात) | | | सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षात या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत असलेले अनुदान (रुपये लाखात) | | | सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षात या शासन निर्णयासह आता पर्यंत वितरित झालेले अनुदान (रुपये लाखात) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | ग्रामपंचायत कर्मचारी किमान वेतन अनुदान | ग्रामपंचायत सरपंच मानधन व सदस्य बैठक भत्ता अनुदान | एकूण | ग्रामपंचायत कर्मचारी किमान वेतन अनुदान | ग्रामपंचायत सरपंच मानधन व सदस्य बैठक भत्ता अनुदान | एकूण | ग्रामपंचायत कर्मचारी किमान वेतन अनुदान (स्तंभ ३ + स्तंभ ६) | ग्रामपंचायत सरपंच मानधन व सदस्य बैठक भत्ता अनुदान (स्तंभ ४ + स्तंभ ७) | एकूण (स्तंभ ५ + स्तंभ ८) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | ठाणे | ४२.९४ | १७.७५ | ६०.६९ | ८५.८८ | ३५.५० | १२१.३८ | १२८.८२ | ५३.२५ | १८२.०७ |
| २ | रायगड | ३२.८६ | १४.२३ | ४७.०९ | ६५.७२ | २८.४६ | ९४.१८ | ९८.५८ | ४२.६९ | १४१.२७ |
| ३ | रत्नागिरी | ३०.७५ | १३.८८ | ४४.६३ | ६१.५० | २७.७६ | ८९.२६ | ९२.२५ | ४१.६४ | १३३.८९ |
| ४ | सिंधुदूर्ग | १६.९४ | ७.२१ | २४.१५ | ३३.८८ | १४.४२ | ४८.३० | ५०.८२ | २१.६३ | ७२.४५ |
| ५ | नाशिक | ५६.०५ | २३.९५ | ८०.०० | ११२.१० | ४७.९० | १६०.०० | १६८.१५ | ७१.८५ | २४०.०० |
| ६ | धुळे | २२.४५ | ९.५८ | ३२.०३ | ४४.९० | १९.१६ | ६४.०६ | ६७.३५ | २८.७४ | ९६.०९ |
| ७ | नंदुरबार | १९.६१ | ८.८६ | २८.४७ | ३९.२२ | १७.७२ | ५६.९४ | ५८.८३ | २६.५८ | ८५.४१ |
| ८ | जळगांव | ४५.९६ | १९.८४ | ६५.८० | ९१.९२ | ३९.६८ | १३१.६० | १३७.८८ | ५९.५२ | १९७.४० |
| ९ | अहमदनगर | ५५.२९ | २३.५० | ७८.७९ | ११०.५८ | ४७.०० | १५७.५८ | १६५.८७ | ७०.५० | २३६.३७ |
| १० | पुणे | ५१.३० | २३.९८ | ७५.२८ | १०२.६० | ४७.९६ | १५०.५६ | १५३.९० | ७१.९४ | २२५.८४ |
| ११ | सातारा | ५१.०६ | २४.३२ | ७५.३८ | १०२.१२ | ४८.६४ | १५०.७६ | १५३.१८ | ७२.९६ | २२६.१४ |
| १२ | सांगली | ३१.८४ | १२.९६ | ४४.८० | ६३.६८ | २५.९२ | ८९.६० | ९५.५२ | ३८.८८ | १३४.४० |

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १३ | सोलापूर | ४४.८७ | १७.४९ | ६२.३६ | ८९.७४ | ३४.९८ | १२४.७२ | १३४.६१ | ५२.४७ | १८७.०८ |
| १४ | कोल्हापूर | ४४.९५ | १७.७९ | ६२.७४ | ८९.९० | ३५.५८ | १२५.४८ | १३४.८५ | ५३.३७ | १८८.२२ |
| १५ | औरंगाबाद | ३३.५१ | १४.५२ | ४८.०३ | ६७.०२ | २९.०४ | ९६.०६ | १००.५३ | ४३.५६ | १४४.०९ |
| १६ | जालना | २७.२८ | १२.४१ | ३९.६९ | ५४.५६ | २४.८२ | ७९.३८ | ८१.८४ | ३७.२३ | ११९.०७ |
| १७ | परभणी | २२.६१ | ११.०९ | ३३.७० | ४५.२२ | २२.१८ | ६७.४० | ६७.८३ | ३३.२७ | १०१.१० |
| १८ | हिंगोली | १८.५४ | ८.८१ | २७.३५ | ३७.०८ | १७.६२ | ५४.७० | ५५.६२ | २६.४३ | ८२.०५ |
| १९ | बीड | ३५.८७ | १६.३२ | ५२.१९ | ७१.७४ | ३२.६४ | १०४.३८ | १०७.६१ | ४८.९६ | १५६.५७ |
| २० | नांदेड | ४५.३४ | २०.८६ | ६६.२० | ९०.६८ | ४१.७२ | १३२.४० | १३६.०२ | ६२.५८ | १९८.६० |
| २१ | उस्मानाबाद | २४.०३ | १०.५३ | ३४.५६ | ४८.०६ | २१.०६ | ६९.१२ | ७२.०९ | ३१.५९ | १०३.६८ |
| २२ | लातूर | २९.८१ | १३.२४ | ४३.०५ | ५९.६२ | २६.४८ | ८६.१० | ८९.४३ | ३९.७२ | १२९.१५ |
| २३ | बुलढाणा | २६.२१ | १६.४१ | ४२.६२ | ५२.४२ | ३२.८२ | ८५.२४ | ७८.६३ | ४९.२३ | १२७.८६ |
| २४ | अकोला | १९.३७ | ९.९७ | २९.३४ | ३८.७४ | १९.९४ | ५८.६८ | ५८.११ | २९.९१ | ८८.०२ |
| २५ | वाशिम | १८.२० | ८.८१ | २७.०१ | ३६.४० | १७.६२ | ५४.०२ | ५४.६० | २६.४३ | ८१.०३ |
| २६ | अमरावती | २४.३८ | १६.०१ | ४०.३९ | ४८.७६ | ३२.०२ | ८०.७८ | ७३.१४ | ४८.०३ | १२१.१७ |
| २७ | यवतमाळ | ४०.९७ | २१.१० | ६२.०७ | ८१.९४ | ४२.२० | १२४.१४ | १२२.९१ | ६३.३० | १८६.२१ |
| २८ | वर्धा | १८.८५ | ७.७९ | २६.६४ | ३७.७० | १५.५८ | ५३.२८ | ५६.५५ | २३.३७ | ७९.९२ |
| २९ | नागपूर | ३०.६४ | १२.०५ | ४२.६९ | ६१.२८ | २४.१० | ८५.३८ | ९१.९२ | ३६.१५ | १२८.०७ |
| ३० | भंडारा | १९.८९ | ८.२४ | २८.१३ | ३९.७८ | १६.४८ | ५६.२६ | ५९.६७ | २४.७२ | ८४.३९ |
| ३१ | गोंदिया | २१.०३ | ८.४६ | २९.४९ | ४२.०६ | १६.९२ | ५८.९८ | ६३.०९ | २५.३८ | ८८.४७ |
| ३२ | चंद्रपूर | ३०.४५ | १२.७४ | ४३.१९ | ६०.९० | २५.४८ | ८६.३८ | ९१.३५ | ३८.२२ | १२९.५७ |
| ३३ | गडचिरोली | १७.६२ | ७.१६ | २४.७८ | २९.४५ | १४.३८ | ४३.८३ | ४७.०७ | २१.५४ | ६८.६१ |
| | एकूण | १०५१.४७ | ४७१.८६ | १५२३.३३ | २०१७.१५ | ९४३.७८ | ३०४०.९३ | ३१४८.६२ | १४१५.६४ | ४५६४.२६ |